# काटेरी घरात डुग्गू





रेश्मा बर्वे

सकाळ प्रकाशन

# काटेरी घरात डुग्गू



लेखन व चित्र-
रेश्मा बर्वे

डुग्गू जेव्हा कोकणात गेला होता तेव्हाची ही गोष्ट आहे. तिथे एके ठिकाणी हिरवट पिवळट रंगाची खूपशी घरं होती. डुग्गू एक पत्ता शोधत होता. एका घराकडे पाहून त्याला वाटलं, 'सापडलं! आपल्याला हवं होतं ते घर हेच'.

घराच्या भिंती काटेरी होत्या. दारंखिडक्यांवरही काटे होते, म्हणून डुग्गूनी दार ठोठावलं नाही. लांबूनच ओरडून विचारलं,

"कोणी आहे का घरात?..

आतून एक पिवळा छोटा प्राणी बाहेर आला.

'कोण आहे?'

'मी डुग्गू..'

'ये, आत ये.'

डुग्गू त्याच्या मागोमाग घरात गेला.



''ही माझी भावंडं.'' पिवळा प्राणी डुग्गूला म्हणाला. त्याच्यासारखीच दिसणारी त्याची भावंडं घरात सोफ्यांवर दाटीवाटीनी बसली होती. एखाद्या सिनेमा थिएटरमधे बसावं तशी. घरात छान गोड वास सुटला होता. डुग्गू कुठे उदबत्ती लावलीये का ते पाहू लागला. मग त्याला एकदम आठवलं,
''मला कापे बंधूंना भेटायचंय...ते तुम्हीच ना?'' डुग्गू म्हणाला.



''कापे?...नाही, आम्ही तर बरके आहोत.'' पिवळा प्राणी म्हणाला. बाकीच्यांनी आपापल्या जागा सोडल्या आणि सगळे डुग्गूभोवती जमा झाले.



''ए हे..याचा पत्ता चुकला.''असं म्हणून सगळे प्राणी डुग्गूला हसू लागले.
''वेडा रे वेडा..असा कसा चुकला?..'' त्यांनी डुग्गूची टर उडवायला सुरुवात केली.
आधी डुग्गूनी लक्ष दिलं नाही पण त्यांचं चिडवणं वाढतच गेलं.





त्यांचा दंगा इतका वाढला की डुग्गूला काही बोलता येईना.
त्यांनी सटासट उड्या मारायला सुरुवात केली.

बापरे,
फणस बरका
निघाला वाटतं !



डुग्गू राहतो इथेच, तुमच्या आमच्यातच.
पण एखाद्या कल्पनेच्या मागे निघाला,
की कुठच्या कुठे जाऊन पोहोचतो...
त्याच्या या मजेदार कल्पनांच्या राज्यात
फिरवून आणणाऱ्या या 'डुग्गूच्या गोष्टी'










३४ मंगलवाडी, [illegible] मार्ग, पुणे ४११०१६
barvereshma@gmail.com

प्रकाशक
सकाळ पेपर्स लि.
५९५, बुधवार पेठ, पुणे २.
संपर्क : ८८८८८ ४९०५० /
०२०-२४४०५६७८.

सकाळ प्रकाशन


ISBN 978-93-80571-91-1
9 789380 571911 >

₹ ४०/-